पोलीस अधीक्षक/ पोलीस उप आयुक्त, बिनतारी (अभियांत्रिकी) या पदावर नियुक्ती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्र. रापोसे-२२१६/प्र.क्र.३२३/पोल-१अ.**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २६ ऑक्टोबर, २०२१.

वाचा :- १. शासन पत्र, गृह विभाग, क्र. रापोसे-२२१६/ प्र.क्र.३२३/पोल-१अ, दि.१०.१०.२०१६ व दि.२३.२.२०१८

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांक-९८६(I)/२५४३८/आठ, दि. २८ जुलै,२०२१.

३. पोलीस उप आयुक्त, विशेष शाखा-१, गुन्हे अन्वेषण विभाग, यांचे पत्र क्र.वपोनि / ग/ पीसीसी/रबाम/टी.आर.१२९/६६८२/२०२१, दि.१४.९.२०२१.

४. अधीक्षक, गोकुळदास तेजपाल रुग्णालय, मुंबई, यांचे पत्र क्र. गोतेरु/वैद्य मंडळ /वै.मं. चे प्रमाणपत्र /९५८१/२०२१, दि.२०.९.२०२१.

**शासन आदेश :-**

मूळ अर्ज क्र.४८२/२०१९ आणि मूळ अर्ज क्र.१२०/२०२१ या प्रकरणांमध्ये मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, यांनी दि.२२.७.२०२१ रोजी दिलेला न्यायनिर्णय व आदेश या अनुसार, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने पत्र क्रमांक-९८६(I)/२५४३८/आठ, दि. २८.०७.२०२१, द्वारे "पोलीस अधीक्षक/ पोलीस उप आयुक्त, बिनतारी (अभियांत्रिकी)", महाराष्ट्र राज्य पोलीस सेवा, गट "अ", (जाहिरात क्र.२४/२०१८) या सरळसेवेच्या कोट्यातील अराखीव पदावर नियुक्तीकरिता श्री. बाळकृष्ण मोतिराम यादव [वर्गवारी- भ.ज.(ब)] यांची शिफारस केली आहे.

२. त्या अनुसार, श्री. बाळकृष्ण मोतिराम यादव, [वर्गवारी- भ.ज.(ब)] यांची "पोलीस अधीक्षक/ पोलीस उप आयुक्त, बिनतारी(अभियांत्रिकी)" या सरळसेवेच्या कोट्यातील अराखीव पदावर याद्वारे, पुढील अटी व शर्तीवर, नियुक्ती करण्यात येत आहे-

१) उमेदवाराचा परिवीक्षा कालावधी ते नियुक्तीच्या पदावर रुजू झाल्याच्या तारखेपासून दोन वर्ष असेल.

२) अपर पोलीस महासंचालक-नि-संचालक, दळणवळण व परिवहन विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांनी विहित केलेला अभ्यासक्रम, प्रशिक्षण व परीक्षा उत्तीर्ण होणे/ पूर्ण करणे उमेदवारास बंधनकारक राहील.

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र. ६१/२००१/३९, दिनांक १९ मार्च, २००३ यामधील तरतुदीनुसार उमेदवाराने संगणक हाताळणे/वापराबाबतचे शासन मान्यताप्राप्त प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षांच्या आत विभागप्रमुखाकडे सादर करणे अनिवार्य राहील.

४) उमेदवारास परिवीक्षा कालावधीमध्ये सातव्या वेतन आयोगानुसार, वेतन बॅण्ड एस-२५: ७८८००-२०९२०० या वेतनश्रेणीत नियमानुसार अनुज्ञेय वेतन मिळेल. परिवीक्षा कालावधीचे एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर त्यांना पहिली वार्षिक वेतनवाढ देण्यात येईल आणि त्यानंतरची वेतनवाढ परिवीक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यावर शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१३७०/डी, दिनांक १२.४.१९७२ अनुसार देण्यात येईल. तसेच, त्यांना नियमाप्रमाणे महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

५) उमेदवारास "राष्ट्रीय निवृत्तिवेतन योजना" लागू राहील.

६) उमेदवारास नियुक्तीवर रुजू होण्यासाठी कराव्या लागणाऱ्या प्रवासासाठी प्रवासभत्ता मिळणार नाही.

७) उमेदवाराने दोन वर्षाचा परिवीक्षा कालावधी किंवा त्यानंतर आवश्यकतेनुसार वाढविलेला परिवीक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर त्याची पोलीस अधीक्षक / पोलीस उप आयुक्त, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी) या संवर्गात नियमित नेमणूक केली जाईल.

८) उमेदवार जर दोन वर्षच्या परिवीक्षा कालावधीत किंवा वाढविलेल्या परिवीक्षा कालावधीत कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त करु शकला नाही आणि / किंवा विहित विभागीय परीक्षा / चाचण्या उत्तीर्ण झाला नाही किंवा गैरवर्तणुकीबद्दल दोषी आढळला किंवा पोलीस सेवेस योग्य नसल्याचे आढळले तर त्याची सेवा समाप्त करण्यात येईल.

९) उमेदवाराने नियमाप्रमाणे विहित मराठी व हिंदी भाषा परीक्षा तसेच विहित विभागीय परीक्षा उत्तीर्ण व्हावे लागेल.

१०) वर नमूद केलेल्या अटी व शर्ती यांव्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील राज्यसेवा अधिकाऱ्यांना लागू असलेले अन्य सर्व सेवाविषयक नियम उक्त उमेदवारास लागू होतील.

३. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२११०२६१७३७२५९५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAIKWAD
KAILAS ARJUN

Digitally signed by GAIKWAD KAILAS ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, pseudonym=98E519306D20397D354BD181099105F0AC1EFDEC, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=GAIKWAD KAILAS ARJUN
Date: 2021.10.26 17:41:47 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**शासनाचे सह सचिव.**

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. अपर पोलीस महासंचालक-नि-संचालक, दळण-वळण व परिवहन विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत,**

१. अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
३. प्रधान महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर.
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, ५ १/२,७ व ८ मजला, कूपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई- ४०००२१ (पत्राने)
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-८, मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
१०.श्री. बी.एम. यादव [पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत]
११.निवडफाईल,पोल-१अ.